**सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता जमीन महसुलावरील उपकर अनुदानाचा माहे डिसेंबर २००९ ते मार्च २०१० या चार महिन्याकरीता चौथा अंतिम हप्ता.**

३६०४-स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. (दत्तमत) -१०१- जमीन महसूल (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ अन्वये जिल्हा परिषदां, पंचायत समित्या व ग्राम पंचायतींना जमीन महसूलावरील उपकर अनुदाने मागणी क्र. एल -५ (३६०४०४७९)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. एलएफसी -२००९/प्र.क्र.५०२९/वित्त-३(२४),
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक : ११ मार्च २०१०.

वाचा : १) शासन निर्णय क्र. एलएफसी -२००९/प्र.क्र.५०२९/वित्त-३(२४), दिनांक २० मे, २००९.
२) शासन निर्णय क्र. एलएफसी -२००९/प्र.क्र.५०२९/वित्त-३(२४), दिनांक १३ जुलै, २००९.
३) शासन निर्णय क्र. एलएफसी -२००९/प्र.क्र.५०२९/वित्त-३(२४), दिनांक २० नोव्हेंबर, २००९.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ मधील कलम १४४,१५१,१५२ व १५५ तसेच मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ मधील कलम १२७,१३१ मधील तरतुदीनुसार जिल्हा परिषदां, पंचायत समित्या आणि ग्राम पंचायतींना जमीन महसूल व जमीन महसूलावरील उपकर अनुदाने वितरित करण्याबाबतची सुधारित कार्यपध्दती शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एलएफसी १०९२/सीआर- १९६३/२४, दिनांक २२ एप्रिल, १९९२ अन्वये विहित करण्यांत आलेली आहे. ही उपकर अनुदाने मंजूर करता यावीत म्हणून सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता रु. ५४,८५,५६,०००/- (रुपये चोपन्न कोटी, पंच्याऐंशी लक्ष,

छप्पन्न हजार फक्त) इतकी मूळ तरतूद करण्यांत आली आहे. जिल्हा परिषदांना थेट उपकर अदा करण्याची पध्दत वित्त विभाग व महसूल विभागाकडून अंतीम करण्यात येत आहे.

२. सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता विनियोजित केलेल्या ५४,८५,५६,०००/- (रुपये चोपन्न कोटी, पंच्याऐंशी लक्ष, छप्पन्न हजार फक्त) पैकी संदर्भाधीन क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये माहे एप्रिल ०९ व मे ०९ आणि जुन २००९ व जुलै २००९ या महिन्या करीता पहिल्या व दुस-या हप्त्यासाठी प्रत्येकी रुपये ९,१४,२६,०००/- ( रुपये नऊ कोटी, चौदा लक्ष, सव्वीस हजार फक्त) प्रमाणे एकूण रुपये १८,२८,५२,०००/- ( रुपये अठरा कोटी, अठठावीस लक्ष, बाव्वन्न हजार फक्त ) एवढी रक्कम जिल्हा परिषदांना जिल्हाधिका-यामार्फत वितरीत करण्यासाठी विभागीय आयुक्ताकडे (सर्व) सुपूर्द करण्यांत आल्या आहेत.त्याच प्रमाणे संदर्भाधीन दिनांक २० नोव्हेंबर,२००९ च्या शासन निर्णयान्वये माहे ऑगस्ट ०९ ते नोव्हेंबर ०९ या चार महिन्याकरीता तिस-या हप्त्यासाठी रुपये १८,२८,५४,०००/-( रुपये अठरा कोटी, अठठावीस लक्ष, चोप्पन्न हजार फक्त ) इतकी अनुदानाची रक्कम जिल्हा परिषदांना वितरीत करण्याकरीता सर्व विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यांत आल्या आहेत. अशा प्रकारे माहे नोव्हेंबर, २००९ पर्यंत तरतूदीपैकी एकूण रुपये ३६,५७,०६,०००/- इतके जमिन महसुल अनुदाने जिल्हा परिषदांना वितरीत करण्याकरीता सर्व विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यांत आले आहे.

३. आता माहे डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० या चार महिन्यासाठी सर्व विभागीय आयुक्तांकडे चौथा अंतिम हप्त्यासाठी अनुदानाची उर्वरीत शिल्लक देय रक्कमा सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविल्या प्रमाणे सुपूर्द करण्यांत येत आहे. त्यानुसार या शासन निर्णयान्वये माहे डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० या चार महिन्या करीता रुपये १८,२८,५०,०००/- ( रुपये अठरा कोटी, अठ्ठावीस लक्ष, पंन्नास हजार फक्त ) एवढया रक्कमा या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मधील रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित जिल्हाधिका-यांना त्यांच्या क्षेत्रातील वसूलीच्या आधारे पंचायत राज संस्थांना उपकर अनुदाने मंजूर करणे शक्य व्हावे म्हणून वाटपासाठी सर्व सबंधीत विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यांत येत आहे. अशा प्रकारे सन २००९-१० या वित्तिय वर्षासाठी मंजूर अनुदानाच्या संर्पूर्ण रक्कमा रुपये ५४,८५,५६,०००/- जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी सर्व विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यात आल्या आहेत. सादर केलेल्या मागणीच्या प्रमाणात जिल्हा परिषदांना मंजूर अनुदानाचे वाटप करण्याची दक्षता घ्यावी. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक -६ मध्ये दर्शविलेल्या अनुदानापेक्षा जास्त वाटप होणार नाही याची विभागीय आयुक्तांनी दक्षता घ्यावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली अनुदाने विभागीय आयुक्तांनी संबंधित जिल्हाधिका-यांकडे पंचायत राज संस्थांना मंजूर करण्यासाठी त्वरित सुपूर्द करावीत आणि वाटप केलेल्या आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात.

५. जिल्हा परिषदांनी या बाबींवर होणारा खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्रमांक एल -५ " ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रक्कमा देणे-१०१ जमीन महसूल (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत

समिती अधिनियम १९६१ व ग्रामपंचायत अधिनियम १९५८ अन्वये जिल्हा परिषदां, पंचायत समित्या व ग्राम पंचायतींना जमीन महसूल उपकर अनुदाने इत्यादी संबंधात अभिहस्तांकित रकमा देणे (जमीन महसूलावरील उपकर अनुदाने) (३६०४०४७९) या लेखाशिर्षाखाली दाखवावा व सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात अधिनस्त ठेवलेल्या तरतूदीमधून खर्ची टाकावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३०९२०१०१३००१ असा आहे.

७. ही अनुदाने शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्देशित केलेल्या विहित अटी व शर्तीच्या अधीन राहतील. हा शासन निर्णय मिळाल्याची कृपया पोच द्यावी.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक: अंदाज-१०.०९ /सीआर--/ २००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च,२००९ अनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( सुरेखा र. सुर्यवंशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१ सर्व विभागीय आयुक्त.
२ सहाय्यक आयुक्त (विकास) सर्व.
३ महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व परिक्षा ), मुंबई (५ जादा प्रतींसह).
४ महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व परिक्षा ), नागपूर (५ जादा प्रतींसह).
५ महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता )मुंबई (५ जादा प्रतींसह).
६ महालेखापाल, महाराष्ट्र- २ ( लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर (५ जादा प्रतींसह).
७ सर्व जिल्हाधिकारी .
८ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व,
९ अध्यक्ष,जिल्हा परिषद सर्व,
१० मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद सर्व,
११ मुख्य लेखा परिक्षक व स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,बेलापूर,नवी मुंबई,
१२ उप मुख्य लेखा परिक्षक व स्थानिक निधी लेखा , कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
१३ महसूल व वन विभाग, एल -५, मंत्रालय, मुंबई,
१४ कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-१५, अर्थसंकल्प-१६, अर्थोपाय,) मंत्रालय, मुंबई
१५ कार्यासन क्रमांक वित्त-१,वित्त-७,वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ,
१६ निवड नस्ती का.क्र.वित्त-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७ कार्यासन-संगणक कक्ष,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

## विवरणपत्र-अ

लेखाशीर्ष ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, या खाली जिल्हा परिषदांना देय असलेल्या सन २००९-२०१० या वित्तीय वर्षातील जमिन महसूल उपकर अनुदानाचा माहे डिसेबर ०९ ते मार्च २०१० या चार महिन्याकरीता वितरीत करावयाचा चौथा **अंतीम** हप्ता.(शासन निर्णय क्रमांक : एलएफसी -२००९/प्र.क्र.५०२९ /वित्त-३(२४), दिनांक :- ११ मार्च, २०१०. चे सहपत्र ))

( आकडे रुपयात )

| अ. क्र. | विभागीय आयुक्तांचे नांव | सन २००९- २०१० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेली अंदाज पत्रकीय तरतूद | माहे एप्रिल २००९ ते नोव्हेंबरे २००९ या कालावधी करीता केलेले एकूण अनुदान | या शासन निर्णयान्वये माहे डिसेंबर०९ ते मार्च२०१० करीता मंजुर करावयाचे चौथ्या हप्त्यासाठीचे अनुदान | अक्षरी | या शासन निर्णयापर्यत मंजूर केलेले एकूण अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | कोकण विभाग | ८,६०,००,००० | ५,७३,३२,००० | २,८६,६८,००० | दोन कोटी, शहाऐंशी लक्ष, अडुसष्ट हजार फक्त. | ८,६०,००,००० |
| २ | नाशिक विभाग | ९,३०,००,००० | ६,२०,०६,००० | ३,०९,९४,००० | तीन कोटी, नऊ लक्ष,चौ-यान्नव हजार फक्त. | ९,३०,००,००० |
| ३ | पुणे विभाग | १८,४६,८२,००० | १२,३१,२०,००० | ६,१५,६२,००० | सहा कोटी, पंधरा लक्ष, बासष्ट हजार फक्त. | १८,४६,८२,००० |
| ४ | औरंगाबाद विभाग | ७,६१,७१,००० | ५,०७,८०,००० | २,५३,९१,००० | दोन कोटी, त्रेप्पन्न लक्ष,ऐक्याण्णव हजार फक्त. | ७,६१,७१,००० |
| ५ | अमरावती विभाग | ५,८२,४९,००० | ३,८८,३२,००० | १,९४,१७,००० | एक कोटी, चौ-याण्णव लक्ष, सतरा हजार फक्त. | ५,८२,४९,००० |
| ६ | नागपूर विभाग | ५,०४,५४,००० | ३,३६,३६,००० | १,६८,१८,००० | एक कोटी, अडुसष्ट लक्ष, अठरा हजार फक्त. | ५,०४,५४,००० |
| ७ | एकूण | ५४,८५,५६,००० | ३६,५७,०६,००० | १८,२८,५०,००० | अठरा कोटी, अठ्ठावीस लक्ष, चोप्पन्न हजार फक्त. | ५४,८५,५६,००० |

( सुरेखा र. सूर्यवंशी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.